निधी वितरण आदेश क्र.१

जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमधील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व भत्ते भागविण्याकरीता सन २०२५-२६ करीता अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जिग्राप्र-११२५/प्र.क्र.२६/योजना-५**
बांधकाम भवन,तळमजला
२५, मर्झबान पथ, फोर्ट,मुंबई-४०० ००१
दिनांक: ०२ जून, २०२५

**वाचा -**

१.ग्राम विकास विभाग शा.निर्णय क्र.जिग्राप्र-११२२/प्र.क्र.४३/योजना-५, दि.०१ एप्रिल, २०२२.
२. ग्राम विकास विभाग शा.निर्णय क्र.पदनि-२०२५/प्र.क्र.१४/योजना-५, दि.०६ मार्च, २०२५.
३. वित्त विभाग शा.निर्णय क्र.अर्थसं-२०२५ /प्र.क्र.४४/अर्थ-३, दि. ०७ एप्रिल, २०२५.

**प्रस्तावना -**

मा. मंत्रीमंडळाच्या दिनांक ३१.०३.२०२२ च्या बैठकीमध्ये जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन योजना बंद करण्याऐवजी राज्य शासनाकडून १००% राज्य योजना म्हणून पुढील ५ वर्षे म्हणजेच दिनांक ०१.०४.२०२२ ते ३१.०३.२०२७ पर्यंत पूर्वीप्रमाणे सुरु ठेवण्याबाबत निर्णय घेण्यात आला. जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन योजनेकरीता दिनांक ०१ एप्रिल, २०२२ पासून १५ पदांऐवजी ८ पदे निश्चित करण्यात आले असून उर्वरित पदावरील अधिकारी / कर्मचारी यांच्या सेवा त्यांच्या मूळ आस्थापनेवर प्रत्यार्पित करण्याबाबत निर्णय घेण्यात आला.

वित्तीय वर्ष २०२५-२६ करीता मागणी क्र. एल-३, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन, लेखाशिर्ष-२५१५ २६०१ (१००% राज्य हिस्सा) अंतर्गत रुपये २७,५०,००,०००/-(सत्तावीस कोटी पन्नास लक्ष फक्त) इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे.

सन २०२५-२६ करीता जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमधील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व भत्ते अदा करण्याकरीता संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (बी.डी.एस.) निधी उपलब्ध करुन देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासनमधील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व भत्ते अदा करण्याकरीता आवश्यक प्रतिमाह वेतनासाठी सरासरी खर्च व त्यांच्याकडील शिल्लक निधी विचारात घेऊन सन २०२५-२६ करीता जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमधील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व भत्ते अदा करण्याकरीता रु.६,६०,००,०००/- (रुपये सहा कोटी साठ लाख फक्त) इतका निधी संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (बी.डी.एस.) खालील विवरणपत्रानुसार वितरीत करण्यात येत आहे : -

**विवरण पत्र**

**(रुपये लाखात)**

| अ.क्र. | जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|
| १. | ठाणे | २०.०० |
| २. | पालघर | २०.०० |
| ३. | रायगड | २०.०० |
| ४. | रत्नागिरी | १०.०० |
| ५. | सिंधुदुर्ग | २०.०० |
| ६. | नाशिक | १०.०० |
| ७. | धुळे | १८.०० |
| ८. | नंदूरबार | २५.०० |
| ९. | जळगांव | २०.०० |
| १० | अहिल्यानगर | २२.०० |
| ११ | पुणे | २८.०० |
| १२. | सातारा | १२.०० |
| १३. | सांगली | १८.०० |
| १४. | सोलापूर | २०.०० |
| १५. | कोल्हापूर | १८.०० |
| १६. | छत्रपती संभाजीनगर | २५.०० |
| १७. | जालना | १४.०० |
| १८. | परभणी | १८.०० |
| १९ | हिंगोली | १३.०० |
| २० | बीड | ३०.०० |
| २१ | नांदेड | २८.०० |
| २२. | धाराशिव | १८.०० |
| २३. | लातूर | २०.०० |

| | | |
|---|---|---|
| २४. | अमरावती | ३०.०० |
| २५. | बुलढाणा | २५.०० |
| २६. | वाशिम | १८.०० |
| २७. | अकोला | १०.०० |
| २८. | यवतमाळ | १०.०० |
| २९. | नागपूर | १३.०० |
| ३०. | वर्धा | १८.०० |
| ३१. | भंडारा | २३.०० |
| ३२. | गोंदिया | ३०.०० |
| ३३. | चंद्रपूर | ११.०० |
| ३४. | गडचिरोली | २५.०० |
| | **एकूण** | **६६०.००** |

प्रस्तुत खर्च ग्राम विकास विभाग मागणी क्र.एल-३, २५१५- इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, ००-१०४- जिल्हा ग्रामीण विकास अभिकरण-प्रशासन (००)(०२)-जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासकीय खर्च राज्य पुरस्कृत योजना (राज्य हिस्सा १००%) (कार्यक्रम), ३६-सहायक अनुदाने (वेतन) (२५१५ २६०१) या लेखाशिर्षांतर्गत सन २०२५-२६ च्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे, अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अंमलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी. तसेच सदर निधी खर्च न झाल्यास संबंधित अधिकाऱ्यास जबाबदार धरण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

सदर अनुदान कोषागारातून काढल्यानंतर प्रकल्प संचालकांनी पुढील माहिती :- १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक, ४) सदर निधी खर्च झाल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र व ५) महालेखापाल कार्यालयातील रकमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र इत्यादी कार्यासन योजना-२ व योजना-५, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, २५-मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४०० ००१ यांच्याकडे पाठवावी.

सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०७, एप्रिल, २०२५ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकाराचा वापर करुन सदर शासन निर्णयातील तपासणी सूचीतील अटी व शर्तीच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६०२१४३३०६९७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANGEETA
GOVIND LANDE

Digitally signed by SANGEETA GOVIND LANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=73d2cd74e0a5b700a8275fcc38c24a2cead4ff61075555472916234d2388715f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=551A2C65FB84CF7CD639C3A2366F1CDC5A13691B2367C2D01195826E7A94A449, cn=SANGEETA GOVIND LANDE
Date: 2025.06.02 14:34:47 +05'30'

**( संगिता गो. लांडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
२) महालेखापाल (लेखापरिक्षा) व (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१,मुंबई.
३) महालेखापाल (लेखापरिक्षा) व (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२,नागपूर.
४) संचालक, लेखा व कोषागार, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) संचालक, निवासी व लेखा कोषागार, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) मु.का.अ., जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जि.ग्रा.वि.यं.(सर्व).
७) उप आयुक्त, (विकास) विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
८) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व).
९) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
१०) मुख्य लेखापरिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
११) वित्त विभाग (व्यय-१५/अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई.
१२) वरिष्ठ लेखाधिकारी, शासनस्तर अंतर्गत लेखा परिक्षण पथक, बांधकाम भवन, मुंबई-०१
१३) निवडनस्ती (कार्यासन योजना-५).